**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - वनशेती उप अभियानाकरिता प्राप्त सर्वसाधारण प्रवर्गासाठीचा सन २०२०-२१ चा अवितरीत असलेला रु.१३१.५० लक्ष निधी पुनर्जिवित करुन सन २०२१-२२ मध्ये विनियोगात आणण्यास मान्यता देणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनशेती-०८२१/प्र.क्र.१३३ (भाग-१)/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०००३२
दिनांक: २५ जानेवारी, २०२२

**संदर्भ:**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.: शाशेअ-२०१७/प्र.क्र.१२६/४-अे, दि. ८ डिसेंबर, २०१७
२. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.: ८-१/२०२०-NRM-SMAF (FTS: ८२३३२), १५ एप्रिल, २०२१
३. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.: १-३/२०२०-NRM-SMAF (FTS: ८४०३०), ३० जून, २०२१
४. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र२०२०/३-१ :.-NRM-SMAF (FTS: ८४०३०), २३ जून, २०२०.
५. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोंबर, २०२२
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.: वनशेती-०७२०/प्र.क्र.८९/१४-अे, दि. २० ऑगस्ट, २०२०

**प्रस्तावना :**

वनशेतीमुळे नैसर्गिक संसाधनांचे संवर्धन करुन वातावरणातील बदल काही प्रमाणात सौम्य होण्याकरिता तसेच उपजीविकीचे नवीन स्त्रोत निर्माण होण्यास व उत्पादनात वाढ होण्यास मदत होऊ शकते. याकरिता शेतीमधील पिकांबरोबरच वृक्ष लागवड वाढविण्याच्या उद्देशाने केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - वनशेती उप अभियान राबविण्यात येत आहे. संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयामुळे केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - वनशेती उप अभियान राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर अभियानाकरिता सन २०२०-२१ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु. १२६.०८लक्ष निधी प्राप्त झाला होता व त्यास समरुप रु. ८४.०५ लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित होते. सदर निधीपैकी केंद्र हिश्श्याचा रु. ४० लक्ष व राज्य हिश्श्याचा रु. २६.६१ लक्ष असा एकूण रु.६६.६१ लक्ष निधी दि. २० ऑगस्ट, २०२० रोजीच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आला असून केंद्र हिश्श्याचा रु. ८६.०८ लक्ष व राज्य हिश्श्याचा रु. ५७.४४ लक्ष निधी वितरीत करणे अद्याप बाकी आहे.

संदर्भ क्र.२ अन्वये केंद्र शासनाने सदर अवितरीत निधी पुनर्जीवित करुन सन २०२१-२२ मध्ये खर्च करण्यास मान्यता दिली आहे. वित्त विभागाच्या संदर्भांकीत दि.१४.१०.२०२१ च्या परिपत्रकान्वये कार्यक्रम खर्चासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ५० टक्के निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान केले आहेत त्यामुळे सद्य:स्थितीत, सर्वसाधारण प्रवर्गासाठी उपलब्ध तरतूदीच्या ५०% निधी विभागाच्या पातळीवरुन वितरीत करणे शक्य आहे. त्यानुसार या उप-अभियानाकरिता सर्वसाधारण प्रवर्गाच्या उपलब्ध तरतूदीच्या ५० टक्के म्हणजे केंद्र हिश्श्याचा रु. १३१.५० लक्ष निधी (केंद्र हिस्सा रु. ७९ कोटी व राज्य हिस्सा रु. ५२.५० कोटी) कृषि आयुक्तालयास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०२०-२१ मधील केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - वनशेती उप अभियानाचा केंद्र हिश्श्याचा रु. ७९ लक्ष व राज्य हिश्श्याचा रु. ५२.५० लक्ष निधी असा एकूण रु. १३१.५० (रु. एक कोटी एकतीस लाख पन्नास हजार फक्त) निधी पुनर्जीवित करुन आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी पुढील लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक डी-३<br>२४०१,पीक संवर्धन,<br>१०९- विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>(०१)(५६) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उपअभियान (कें.पु.यो.)<br>(केंद्र हिस्सा-६०%) (कार्यक्रम)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ ए८२४) | मागणी क्रमांक- एन-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९- विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>(०१)(५७) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उपअभियान (कें.पु.यो.)<br>(राज्य हिस्सा-४०%) (कार्यक्रम)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ ए८३३) |

३. सदर निधी फक्त सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २ जुलै, २०२० रोजीच्या पत्रान्वये मंजूर केलेल्या बाबींवरच खर्च करावा.

५. सदर निधी लाभार्थ्यांना PFMS प्रणालीव्दारे त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर वितरीत होत असल्याची खातरजमा आयुक्त (कृषि) यांनी करावी.

६. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि. ८ डिसेंबर, २०१७ चा शासन निर्णय, केंद्र शासनाच्या दि.०२ जुलै, २०२० च्या पत्रातील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर निधी खर्च विहीत कार्यपद्धती अनुसरुन, सर्व वित्तीय कायदे/नियमांचे/प्रकियेचे पालन करून व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाची वा परिपत्रकाचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

८. सदर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. निधीचे आहरण व संवितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

९. सदर कार्यक्रमाची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने संचालक (फलोत्पादन) यांनी सविस्तर सूचना निर्गमित कराव्यात.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२५१२२१४५७३०१ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C
ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.01.25 12:25:18 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,
२. मा. राज्यमंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,
४. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,

५. अ.मु.स. (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२,
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
७. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०.सर्व विभागीय कृषी सह संचालक,
११.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई,
१४.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
१५.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर,
१६.सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग. मंत्रालय, मुंबई-३२,
१७.वित्त विभाग (व्यय १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई -३२,
१८. निवड नस्ती १४-अे